**जलस्वराज्य-2 कार्यक्रम**
राज्यस्तरीय विशेष संनियंत्रण कक्ष (तांत्रिक) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा तसेच सार्वजनिक आरोग्य विभागामध्ये कार्यक्रम अंमलबजावणी करिता विशेष संनियंत्रण कक्षाची स्थापना.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
**शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-0114/प्र.क्र.06/पापु-11,**
**7 वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,**
**नविन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- 400 001.**
तारीख: **30 जानेवारी 2015.**

**वाचा**

1) शासन निर्णय क्रमांकः पा.पु.व.स्व. विभाग क्रमांक जस्वप्र-1233/प्र.क्र.200/पापु-11, दि. 04/01/2014
2) शासन निर्णय क्रमांकः पा.पु.व.स्व. विभाग क्रमांक जस्वप्र-0114/प्र.क्र.05/पापु-11, दि. 06/02/2014
3) शासन निर्णय क्रमांकः पा.पु.व.स्व. विभाग क्रमांक जस्वप्र-0114/प्र.क्र.06/पापु-11, दि. 07/02/2014
4) शासन निर्णय क्रमांकः पा.पु.व.स्व. विभाग क्रमांक डब्ल्युक्युएम-2014/प्र.क्र.08/पापु-12, दि. 18/12/2014

**प्रस्तावना**

जलस्वराज्य-2 कार्यक्रमाची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्याकरिता संदर्भाधिन क्रमांक 3 येथील दिनांक 07/02/2014 च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत आरोग्य सेवा संचालनालय (सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा) या यंत्रणेमध्ये उप संचालक, सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांच्या स्तरावर विशेष संनियंत्रण कक्ष गठित करण्यात आला असून सदर कक्षासाठी संनियंत्रण व मूल्यमापन सहाय्यक व निम्न व्यवसायी यांचे प्रत्येकी एक पद कंत्राटी पध्दतीने भरण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे.

आता सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संनियंत्रणाखाली असलेल्या जिल्हा पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळा व उप विभागीय प्रयोगशाळा, साहित्य व प्रयोगशाळेत कार्यरत असलेल्या कंत्राटी मनुष्यबळासह पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या संनियंत्रणाखाली घेण्यास उपरोक्त संदर्भाधिन दिनांक 18/12/2014 च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तत्पुर्वी दिनांक 07/02/2014 च्या शासन निर्णयान्वये भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणे अंतर्गत विशेष संनियंत्रण कक्ष गठित करण्यात आला आहे. त्यामुळे आता सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत आरोग्य सेवा संचालनालय (सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा) या यंत्रणेमध्ये उप संचालक, सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांच्या स्तरावर विशेष संनियंत्रण कक्ष गठित करण्याची आवश्यकता उरलेली नाही. त्याच बरोबर भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेअंतर्गत गठित करण्यात आलेल्या विशेष संनियंत्रण कक्षामध्ये संनियंत्रण व मूल्यमापन सहाय्यक तसेच निम्न व्यवसायी यांचे प्रत्येकी एक पद निर्माण करण्यात आले असल्याने उप संचालक, सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांच्या स्तरावरील विशेष संनियंत्रण कक्षासाठी निर्माण करण्यात आलेल्या संनियंत्रण व मूल्यमापन सहाय्यक व निम्न व्यवसायी या दोन पदांची आता आवश्यकता उरलेली नाही. सदर बाब विचारात घेऊन खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय

उपरोक्त संदर्भाधिन क्रमांक 3 येथील दिनांक 07/02/2014 च्या शासन निर्णयातील अ.क्र. 3 अन्वये सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत आरोग्य सेवा संचालनालय (सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा) या यंत्रणेमध्ये उप संचालक, सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांच्या स्तरावर विशेष संनियंत्रण कक्ष गठित करावयाचा घेण्यात आलेला निर्णय याद्वारे रद्द करण्यात येत आहे. तसेच सदर कक्षासाठी जलस्वराज्य-2 कार्यक्रम कालावधीपुरती निर्माण करण्यात आलेली संनियंत्रण व मूल्यमापन सहाय्यक व निम्न व्यावसायी ही दोन पदेही रद्द करण्यात येत आहेत. त्या अनुषंगाने सदर दोन पदे भरण्यासाठी

दिनांक 07/02/2014 च्या शासन निर्णयातील अ.क्र. 7 (क) अन्वये संचालक, आरोग्य सेवा संचालनालय यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेली निवड समितीही रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201501301138105328 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DHALAPE KALURAM JANU

Digitally signed by DHALAPE KALURAM JANU
DN: CN = DHALAPE KALURAM JANU, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918028
Date: 2015.01.30 16:02:51 +05'30'

**(का.जा. धलपे)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत,

1. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-26
2. मा. मुख्यमंत्री, म.रा. यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-32
3. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), म.रा. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-32
4. मा.मंत्री (सर्व), म.रा. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-32
5. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), म.रा. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- 32
6. मा.राज्यमंत्री (सर्व), म.रा. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-32
7. मा. विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई-32
8. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, महाराष्ट्र शासन, तथा सदस्य, शक्ती प्रदान समिती
9. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र शासन तथा अध्यक्ष शक्ती प्रदान समिती
10. प्रधान सचिव, ग्राम विकास व पंचायतराज विभाग, महाराष्ट्र शासन तथा सदस्य, शक्ती प्रदान समिती

11. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई
12. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, महाराष्ट्र शासन तथा विशेष निमंत्रित, शक्ती प्रदान समिती
13. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, महाराष्ट्र शासन तथा सदस्य शक्ती प्रदान समिती
14. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-32
15. प्रधान सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र शासन तथा सदस्य शक्ती प्रधान समिती
16. विभागीय आयुक्त (सर्व)
17. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
18. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
19. महालेखापाल-1 (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
20. महालेखापाल-2 (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, नागपूर
21. जिल्हाधिकारी (सर्व)
22. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा (सर्व)
23. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
24. उप संचालक (आरोग्य सेवा), राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे
25. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई
26. मुख्यलेखापरीक्षण, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
27. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, (सर्व)
28. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
29. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
30. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषदा (सर्व)
31. प्रादेशिक उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
32. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
33. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषदा (सर्व)
34. जिल्हा वरिष्ठ भू-वैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
35. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत/पाणी व स्वच्छता) जिल्हा परिषदा (सर्व)
36. गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
37. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने

